201104281555150001

प्रादेशिक योजना - अमरावती

मौ.शिरजगांव बंड ता. चांदूरबाजार येथील स.क्र.१७८/२ मधील क्षेत्र १.४४ हे. औद्योगिक विभागातून वगळून रहिवास विभागात समाविष्ट करणेबाबत महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम, १९६६ चे कलम २० (३) अन्वये फेरबदलाची सूचना ...

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्र. टिपीएस-२७१०/८०८/प्र.क्र.१९१/२०१०/नवि-३०.
मंत्रालय, मुंबई - ३२.
दिनांक: 18 APR 2011

शासन निर्णय :- सोबतची सूचना महाराष्ट्र शासन राजपत्रात प्रसिद्ध करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

(शिवाजी पाटणकर)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती.
२) जिल्हाधिकारी, अमरावती.
३) संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) उप सचिव (नगररचना), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) उप संचालक नगररचना, अमरावती विभाग, अमरावती.
(त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतच्या सूचनेनूसार भाग नकाशे अधिप्रमाणित करणेकरीता शासनास पाठवावेत)
६) सहायक संचालक नगररचना, अमरावती शाखा, अमरावती.
७) सहायक संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
(त्यांना विनंती करण्यात येते की, प्रस्तुत सूचना खालील सूचनांप्रमाणे जाहीरात म्हणून कृपया प्रसिध्द करण्यात यावी. सदर सूचना कोणत्या दिनांकास प्रसिध्द करण्यात आली आहे. त्याबाबतची माहिती शासन, संचालक नगररचना,

महाराष्ट्र राज्य, पुणे व उपसंचालक नगररचना, अमरावती विभाग, अमरावती यांना द्यावी.)

| | | | |
|---|---|---|---|
| १ | जाहीरात देणाऱ्या कार्यालयाचे नांव | - | नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२. |
| २ | जाहीरात कोणत्या दिनांकापर्यंत द्यावयाची आहे. | - | तात्काळ |
| ३ | प्रसिध्दीचे स्वरुप | - | स्थानिक |
| ४ | कोणत्या जिल्हयात | - | अमरावती जिल्हयात |
| ५ | किती वृत्तपत्रात | - | एका मराठी व एका इंग्रजी वृत्तपत्रात |
| ६ | वृत्तपत्राचे नांव | - | सर्वाधिक खपाच्या वृत्तपत्रात |
| ७ | कितीवेळा | - | एकदा |
| ८ | जाहीरात खर्चाचे देयक कोणत्या अधिकाऱ्याकडे पाठवावयाचे त्याच्या कार्यालयाचे नांव व संपूर्ण पत्ता | - | संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे. |

८) व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय, नागपूर.

(त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतची सूचना महाराष्ट्र शासन राजपत्राच्या अमरावती विभागीय पुरवणीमध्ये प्रसिध्द करुन त्याच्या ५ प्रती या विभागास व संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे व उप संचालक नगर रचना अमरावती विभाग अमरावती यांच्याकडे पाठवाव्यात.)

९) कक्ष अधिकारी, कार्यासन नवि-२९, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

(त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतची सूचना शासनाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करावी.)

१०) निवड नस्ती, (कार्यासन नवि-३०)

**************

**प्रादेशिक योजना - अमरावती**

**महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम, १९६६ चे कलम-२०[३] अन्वये सूचना....**

सूचना

महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग

मंत्रालय, मुंबई - ४०००३२.

दिनांक :- मार्च २०११ 18 APR 2011

महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम, १९६६

क्रमांक : टिपीएस-२७१०/८०८/प्र.क्र.१९१/२०१०/नवि-३०:- ज्याअर्थी अमरावती जिल्ह्याची प्रादेशिक योजना [यापुढे " उक्त प्रादेशिक योजना" असे उल्लेखिलेले] शासन अधिसूचना, नगर विकास विभाग क्र. टिपीएस-२८८७/प्र.क्र.१९६/नवि-३०, दिनांक २९ मे, १९९३ अन्वये मंजूर झाली असून ती दिनांक १५ ऑगस्ट, १९९३ पासून अंमलात आली आहे ;

आणि ज्याअर्थी उक्त प्रादेशिक योजनेतील चांदूरबाजार शहराच्या मंजूर परीसर नकाशातील मौजे शिरजगांव बंड येथील सर्वे क्र.१७८/२ चे नकाशात दर्शविलेले १.४४ हे. क्षेत्र { यापुढे "उक्त क्षेत्र" असे उल्लेखिलेला} औद्योगिक विभागात समाविष्ट आहे;

आणि ज्याअर्थी उक्त क्षेत्र औद्योगिक महामंडळाचे कोणत्याही प्रकल्पाकरिता आरक्षित नसल्याने व महामंडळाचे भूसंपादन प्रस्तावित नसल्याने, तसेच परिसरात याच सर्व्हे नंबरमधील काही भागात रहिवास वापर सुरु आहे. याचा विचार करता, महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन, नगररचना अधिनियम, १९६६ (महाराष्ट्र अधिनियम १९६६ चा ३७ वा) (यापुढे "उक्त अधिनियम" असे उल्लेखिलेला) चे कलम-२० पोटकलम(२) मधील तरतुदीनूसार, उक्त क्षेत्र खालील अटीच्या अधिन राहून औद्योगिक विभागातून वगळून रहिवास विभागात समाविष्ट करणे आवश्यक आहे असे शासनाचे मत झाले आहे (यापुढे "उक्त फेरबदल" असे उल्लेखिलेला)

अट - १) फेरबदलाखालील क्षेत्राचा अभिन्यास करताना त्यामध्ये १०% अनिवार्य खुल्या जागेव्यतिरीक्त अतिरिक्त१०% क्षेत्र सार्वजनिक सुविधांसाठी सोडण्यात यावे.

२) जमीन मालक / विकास कर्त्याने पायाभुत सुविधा उदा.पाणी, बीज, मलनिस्सारण इतर नागरी सुविधा स्वत: स्वखर्चाने उपलब्ध करुन देतील.

३) प्रस्तावित औद्योगिक क्षेत्र व रहिवास वापर यामध्ये २३ मीटर रुंदीचा बफर झोन सोडण्यात यावा.

आणि त्याअर्थी उक्त अधिनियमाच्या कलम २० च्या पोटकलम (३) अन्वये उक्त प्रस्तावित फेरबदलाच्या अनुषंगाने नागरिकाना काही सूचना/हरकती दयावयाच्या असतील तर त्यांनी ही सूचना महाराष्ट्र शासन राजपत्रात प्रसिध्द झाल्याच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत त्यांच्या सूचना/हरकत लेखी स्वरुपात उप संचालक नगर रचना, अमरावती विभाग, निलगिरी, डॉ.अग्रवाल यांची इमारत, विजय कॉलनी, काँग्रसनगर रोड, डॉ.जामठे यांच्या दवाखान्याजवळ, अमरावती येथे पाठवाव्यात, उक्त फेरबदल प्रस्तावावर प्राप्त हरकती / सूचनांवर सुनावणी देण्यासाठी उप संचालक नगर रचना, अमरावती विभाग यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांनी उक्त प्रस्तावित फेरबदलावर प्राप्त होणा-या हरकती / सूचनांवर सर्व संबंधितांना सुनावणी देऊन अहवाल शासनास सादर करावा. सदर सूचना महाराष्ट्र शासन राजपत्रात प्रसिध्द झाल्याच्या दिनांकापासून ३० दिवसाच्या आत आलेल्या हरकती / सूचनांचाच विचार केला जाईल.

टिप :- अ) वरील उक्त प्रस्तावित फेरबदल दर्शविणारा भाग नकाशा खालील कार्यालयात कामकाजाच्या दिवशी नागरिकांच्या अवलोकनार्थ ठेवण्यात आला आहे.

१) जिल्हाधिकारी, अमरावती,
२) उप संचालक नगररचना, अमरावती विभाग, अमरावती.
३) सहायक संचालक नगररचना, अमरावती शाखा, अमरावती.

ब) प्रस्तुत सूचना शासनाच्या वेबसाईटवर www.urban.maharashtra.gov.in हया वेबसाईटवर उपलब्ध आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानूसार व नावांने,

[ शिवाजी पाटणकर ]
महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव

**Regional Plan – Amaravati**
Notice under section - 20 [3] of the Maharashtra Regional & Town Planning Act, 1966...

**NOTICE**

**Government of Maharashtra**
**Urban Development Department,**
**Mantralaya, Mumbai 400 032.**
**Dated :- ...... April, 2011.** 18 APR 2011

***THE MAHARASHTRA REGIONAL & TOWN PLANNING ACT, 1966.***

**No.TPS-2710/808/CR-191/2010/UD-30:-** Whereas the Regional Plan for Amaravati District [hereinafter referred to as "the said Regional Plan"] has been sanctioned vide Urban Development Department's Notification No. TPS-2887/CR-196/UD-30, dated 29th May of 1993 and came into force from 15th August of 1993 ;

And whereas, in the approved Peripheral Plan of Chandurbazar City, the land bearing Survey No. 178/2 area 1.44 Ha. of mouza Shirajgaonband (hereinafter referred to as "the said land") is included in Industrial Zone;

Considering the facts that the said land is not reserved for any MIDC Project and not proposed for acquisition by MIDC, also in the surrounding area & in some parts of same survey number, the land is used for residential purpose, Government is of the opinion that as provided in sub-section (2) of section20 of the Maharashtra Regional and Town Planning Act, 1966 (Maharashtra Act. No. XXXIIV) (hereinafter referred to as "the said Act"), the said land may be deleted from Industrial Zone and lands so released may be included in Residential Zone (hereinafter referred to as "the said Modification") subject to the condition specified below –

**Conditions:-**

1) In the layout of the said land in addition to 10% compulsory layout open space, 10% amenity space shall kept open.
2) The land owner/developer shall make available the civic amenities like water supply, electricity, drainage etc. at his own cost.
3) The buffer zone of 23 mt. shall be kept between proposed Industrial Zone and Residential Zone.

Now, therefore, as provided in sub section (3) of the section 20 of the said Act, suggestions/objections, if any on the said proposed modification are invited from general public in writing with reasons thereof, within 30 days from the date of publication of this Notice in the Maharashtra Government Gazette. The suggestions/objections shall be addressed to the Dy. Director of Town Planning, Amaravati Division, "Nilgiri", Dr. Agarwal Building, Vijay

Colony, Congress Nagar Road, Near Dr. Jamthes Dispensary, Amaravati who is hereby appointed as an "Officer" for giving hearing on suggestions/objections that may be received on the said proposed modification and to submit his report to the Government after giving hearing to all concerned. The suggestions/objections received within the period of 30 days from the date of publication of this Notice in the Maharashtra Govt. Gazette only will be considered.

**Note :- A)** The part plan showing the said Proposed Modification is kept open for inspection for the general public during the office hours on all working days at following offices :

1) The Collector, Amaravati.
2) The Deputy Director of Town Planning, Amaravati Division, Amaravti.
3) The Assistant Director of Town Planning, Amaravati Branch, Amaravati

**B)** The aforesaid Notice is available on Government Web Site @ www.Urban. maharashtra.gov.in

**By order and in the name of the Governor of Maharashtra,**

**[ Shivaji Patankar ]**
**Under Secretary to Government**